पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांच्या प्रशासकीय इमारतीच्या दुरुस्तीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
**शासन निर्णय क्रमांक : पुलदे- २०१९/प्र.क्र.२६/सां.का.२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च , २०२२.

वाचा:
१. शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.पुलदे-२०१८/प्र.क्र.२३/सां.का.२,दि.२८ मार्च, २०१८.
२. शासन निर्णय पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.पुलदे-२०१९/प्र.क्र.२६/सां.का.२,दि. ३० मार्च, २०१९.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांचे पत्र क्र. मुअ(मुं)/का-२ (अ)/३७४२/२०२१, दि. २६ ऑक्टोबर, २०२१.
४. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र. पुलदे-९३८, दि. २० डिसेंबर, २०२१.
५. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी यांचे पत्र क्र. पुलदे-९६७, दि. ३० डिसेंबर, २०२१.

प्रस्तावना :-

पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीच्या प्रशासकीय इमारतीमधील महिला व पुरुष स्वच्छतागृहांचे नुतनीकरण, वाहनतळाची दुरुस्ती तसेच वाहनतळामधील मल:निस्सारण सुविधा सुस्थितीत करणे इ. कामांसाठी रु. ४०९.२३ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता व रु.१६८.३२ लक्ष इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये रु. २०७.९० लक्ष रकमेस वित्तीय मान्यता देण्यात आलेली आहे. अशाप्रकारे या कामांसाठी एकूण रु.३७६.१३ लक्ष रकमेची वित्तीय मान्यता देण्यात आलेली आहे.

२. आता प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी संदर्भ क्र.४ येथील पत्रान्वये अकादमीच्या प्रशासकीय इमारतीमधील पहिला ते चौथा मजला नुतनीकरण करणे (सिलिंगच्या स्लॅबमध्ये भेगा पडल्या आहेत, बिमला तडे जाऊन लोखंडी सळया उघडया पडल्या आहेत, त्यांच्या दुरुस्तीची कामे तसेच दरवाजे, खिडक्या नवीन बसविणे, रंगकाम करणे इ. कामे) या कामांसाठी रु. ४,४६,४९,५६८/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी संदर्भ क्र. ३ येथील आदेशान्वये या कामांच्या रु. ४,४६,४९,५६८/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास तांत्रिक सहमती दिली आहे.

३. सबब, उपनिर्दिष्ट कामांसाठी रु. ४,४६,४९,५६८/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीच्या प्रशासकीय इमारतीमधील पहिला ते चौथा मजला नुतनीकरण करणे (सिलिंगच्या स्लॅबमध्ये भेगा पडल्या आहेत, बिमला तडे जाऊन लोखंडी सळया उघडया पडल्या आहेत, त्यांच्या दुरुस्तीची कामे तसेच दरवाजे, खिडक्या नवीन बसविणे, रंगकाम करणे इ. कामे) या कामांसाठी रु. ४,४६,४९,५६८/- (रु. चार कोटी सेहचाळीस लक्ष एकोणपन्नास हजार पाचशे अडुसष्ट फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. तसेच, सदरची रक्कम सार्वजनिक बांधकाम विभागाकडे ठेव अंशदान स्वरुपात (Deposit Contribution Work) ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. झेडडी -२, २२०५ - कला व संस्कृती (०७) कला अकादमी (०७) (०१) पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई (अनिवार्य) (२२०५ १४६३) २७- लहान बांधकामे या लेखाशिर्षांतर्गत त्या त्या आर्थिक वर्षातील उपलब्ध तरतूदीमधुन भागविण्यात यावा.

३. प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांनी त्या त्या आर्थिक वर्षात उपलब्ध होणारा निधी सार्वजनिक बांधकाम विभागाकडून ठेव अंशदान स्वरुपात सुपूर्त करण्याची कार्यवाही करावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि. १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका भाग पहिला, उपविभाग-५ मधील अनुक्रमांक १०, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्र.१३४ नुसार, वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थसंकल्प-३, दि. १८ एप्रिल, २०१७, तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग परिपत्रक क्र. संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दि. २५ सप्टेंबर, २०१९ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. या संदर्भात विविध अटींचे पालन करण्यात यावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०३२८१८०३०६२३२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

SUMANT DINKAR PASHTE

Digitally signed by SUMANT DINKAR PASHTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=58694d4cd2bd16f0ab6514fc8598a9aa217e2508455856a701adb1bb6ef9b120, pseudonym=565ADED7321B71A5B0327BA1F7149AED1F618E4E, serialNumber=AFC006DAAE95D0F2CF7C7F09CA18CF0C9C9363A05E6070B1C03455CF1CB43586, cn=SUMANT DINKAR PASHTE
Date: 2022.03.28 18:05:38 +05'30'

**(सु.दि.पाष्टे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मंत्री, सार्वजनिक बांधकाम यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
३) सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.
६) प्रकल्प संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई.

७) अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) महालेखापाल, महाराष्ट्र -१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई.
९) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११) निवड नस्ती, सां.का.२.